2011010715432001

# महाराष्ट्र शासन

आदेश क्र. पीसीसी३०१०/प्र.क्र.३०५/नवि २२
नगर विकास विभाग
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक- ५ जानेवारी, २०११

**विषय-** श्री.उत्तम मुक्ताजी हिरवे,नगरसेवक यांना नगरसेवक पदावरुन काढून टाकणेबाबत.

**संदर्भ -** आयुक्त,पिंपरी चिंचवड शहर महानगरपालिकेच जा.क्र.प्रशासन/ ६/ कवि/ ३८३/१० दि.३०.०६.२०१० व त्या सोबतचा महासभा ठराव क्र. ८१९ दि. २०.०२.२०१० व महासभा ठराव क्र.९०७ दि.१९.०६.२०१० तसेच कारणे दाखवा नोटीसची प्रत, खुलाश्याची व सहपत्रे.

**शासन आदेश :**

ज्याअर्थी मुंबई प्रांतिक महानगरपालिका अधिनियम १९४९ चे कलम १३ (१) अन्वये पिंपरी चिंचवड महानगरपालिकेचे स्विकृत नगरसेवक श्री.उत्तम मुक्ताजी हिरवे यांना गैरवर्तनासाठी तसेच सदस्य या नात्याने आपली कर्तव्ये पार पाडण्यास असमर्थ असल्याने त्यांचे सदस्य पद रद्द करण्याबाबत नोटीस देवून, त्यांचा खुलासा घेवून, महानगरपालिका महासभेतील एकूण ११० नगरसेवकांपैकी सभेत उपस्थित ८५ नगरसेवक / सदस्यांच्या सर्वानुमते ठराव क्र.९०७ दि.१९.०६.२०१० पारित करुन श्री.हिरवे यांना नगरसेवक पदावरुन काढून टाकण्याची महासभेने शिफारस केली आहे. त्यांअर्थी, श्री.उत्तम मुक्ताजी हिरवे, स्विकृत नगरसेवक, पिंपरी चिंचवड महानगरपालिका यांना उक्त अधिनियमाचे कलम १३(१) अन्वये प्राप्त अधिकारात या आदेशाच्या तारखेपासून नगरसेवक पदावरुन काढून टाकण्यात येत आहे.

०२. सदर आदेश तात्काळ अंमलात येतील आणि आदेशाच्या तारखेपासून पिंपरी चिंचवड शहर महानगरपालिकेचे स्विकृत नगरसेवकाचे सदर पद रिक्त झाल्याचे समजण्यात येईल.

०३. या आदेशानुषंगीक सर्व संविधानिक बाबीची पूर्तता व पुढील योग्य ती आवश्यक कार्यवाही आयुक्त,पिंपरी चिंचवड शहर महानगरपालिका यांनी करावी.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने

०५/११/२०११

(सुनिल कोठेकर)
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रति,

१. मा.मुख्यमंत्र्याचे सचिव, मंत्रालय, मुंबई - ३२.
२. आयुक्त, पिंपरी चिंचवड शहर महानगरपालिका,पिंपरी,पुणे.
३. अति.आयुक्त, पिंपरी चिंचवड शहर महानगरपालिका,पिंपरी,पुणे.
४. नगर सचिव , पिंपरी चिंचवड शहर महानगरपालिका,पिंपरी,पुणे.
५. कक्ष अधिकारी (संगणक शाखा), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई - ३२.
६. निवडनस्ती (नवि-२२)